महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश २००२ अन्वये
"शासकीय माहिती अधिकारी" पदनिर्देशित करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
आदेश क्र.एमआयएस-०१०४/१५६/प्र.क्र.१५/पोल-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : 27 ऑक्टोबर, २००४

वाचा : (१) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र.ममाअ-२००२/प्र.क्र.१६/२००२/५, दि.३०.९.२००२

## आ दे श

शासनाच्या कारभारात पारदर्शकता आणण्यासाठी व जबाबदार प्रशासन तयार करण्यासाठी, शासन कारभाराची जनतेला जास्तीत जास्त माहिती मिळावी याकरिता महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ तसेच सदर आदेशाची अंमलबजावणी करण्याकरिता महाराष्ट्र माहितीचा अधिकार नियम, २००२ चे शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्र.ममाअ-२००२/प्र.क्र.१६/२००२/५, दि.३०.९.२००२ नुसार निर्गमित करण्यात आले आहे.

२. उपरोक्त अध्यादेशातील [illegible] प्रत्येक कार्यालयात "शासकीय माहिती अधिकारी" पद निर्देशित करणे आवश्यक आहे.

३. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर कार्यालयाकरिता शासकीय माहिती अधिकारी म्हणून खालील अधिकाऱ्यांना पदनिर्देशित करण्यात येत आहे. तसेच उपरोक्त अध्यादेशातील कलम २(१) व २(३) नुसार खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये नमूद अपील प्राधिकारी असतील.

| अ. क्र. | पदनिर्देशित शासकीय माहिती अधिकारी | दूरध्वनी क्रमांक | अपिलीय प्राधिकारी | दूरध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सदस्य, कोर्ट रुम नं.२, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर. | २५५७२३५ | सदस्य, कोर्ट रुम नं.१, सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर | २५५०९२६ |

४. उपरोक्त शासकीय माहिती अधिकारी यांनी महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ अन्वये महाराष्ट्र माहितीचा नियम, २००२ मधील नियमांचे काटेकोरपणे पालन करावे. शासकीय माहिती अधिकारी यांना मोटार अपघात दावा न्यायाधिकरण यांचे कार्यालयातील संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी वेळोवेळी आवश्यक ती माहिती द्यावी व सक्रिय सहकार्य करावे.

५. महाराष्ट्र माहितीचा अधिकार अध्यादेश, २००२ तसेच महाराष्ट्र माहितीचा नियम, २००२ तरतुदीमधील कोणत्याही तरतुदीचे उल्लंघन झाल्यास किंवा अर्जदारांना खोटी माहिती पुरविल्यास किंवा शासकीय माहिती अधिकाऱ्यांनी अपेक्षित कार्य न केल्यास इत्यादी बाबींसाठी सदर अध्यादेश / नियम यातील तरतुदीनुसार सर्व अधिकारी / कर्मचारी शिक्षेस पात्र ठरतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुरेश शिंदे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
प्रबंधक, लोक आयुक्त / उप लोक आयुक्त, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई / नागपूर.
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई / नागपूर
राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर
सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर
शासनाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (परिवहन-५)